पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय
स्पर्धा (मुख्य) परीक्षा - २००७.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग,

शासन परिपत्रक क्रमांक -पीएसबी-०३०७/प्र.क्र.६९०/पोल-५(अ),
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : ६ जून, २००९.

वाचा :-१) शासन परिपत्रक, गृह विभाग, क्रमांक-पीएसबी-०३०७/प्र.क्र.६९०/पोल-५(अ), दिनांक ५ सप्टेंबर, २००८.

२) शासन परिपत्रक, गृह विभाग, क्रमांक-पीएसबी-०३०७/प्र.क्र.६९०/पोल-५(अ), दिनांक १९ डिसेंबर, २००८,

३) शासन परिपत्रक, गृह विभाग, क्रमांक-पीएसबी-०३०७/प्र.क्र.६९०/पोल-५(अ), दिनांक २४ मार्च, २००९,

४) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.२२५३/२००८/अठरा, दिनांक ३ जून, २००९.

शासन परिपत्रक :- शासन परिपत्रक, गृह विभाग, क्रमांक-पीएसबी-०३०७/प्र.क्र.६९०/ पोल-५(अ), दिनांक २४ मार्च, २००९ नुसार महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी मर्यादित विभागीय स्पर्धा (मुख्य) परीक्षा-२००७ करिता परिपत्रक निर्गमित करण्यात आलेले आहे. ही परीक्षा महाराष्ट्र लोकसेवा आयोग यांच्याकडून दि.५ एप्रिल, २००९ रोजी घेण्यात आलेली आहे. त्या परीक्षेची पहिली उत्तरतालिका (KEY) आयोगाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आलेली आहे. यासंबंधी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिनांक ३ जून, २००९ च्या पत्रानुसार याबाबत खालीलप्रमाणे घोषणा केलेली आहे:-

"महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत दिनांक ५ एप्रिल, २००९ रोजी घेण्यात आलेल्या पोलीस उपनिरीक्षक (मर्यादित) विभागीय स्पर्धा (मुख्य) परीक्षा - २००७ च्या वस्तुनिष्ठ प्रश्नपत्रिकेची चारही संचाची उत्तरतालिका उमेदवारांच्या माहितीसाठी **http://mpsc.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आली आहे.

सदर उत्तरतालिकेतील प्रश्न-उत्तरासंबंधी उमेदवारांना निवेदने करावयाची असल्यास अधिप्रमाणित स्पष्टीकरण/ संदर्भासह आपले लेखी निवेदन टपालाने पाठवावे. या संदर्भात दिनांक १२ जून, २००९ पर्यंत आयोगाकडे पोहोचलेल्या लेखी निवेदनांची फक्त दखल घेतली जाईल. तद्नंतर आलेली निवेदने विचारात घेतली जाणार नाहीत, याची कृपया नोंद घ्यावी."

आयोगाची उक्त घोषणा या परिपत्रकाद्वारे सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक, पोलीस हवालदार, पोलीस नाईक व पोलीस शिपाई या संवर्गातील सर्व कर्मचा-यांच्या (रजेवर / प्रतिनियुक्तीवर असणा-या कर्मचा-यांसह) निदर्शनास आणावे.

सदर परिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्यांचा संगणक संकेतांक-२००९०६०६१८५५२२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( सु. ग. सोनवणे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रति,

१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने).
२) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
४) संचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, मुंबई.
५) अप्पर पोलीस महासंचालक, गुन्हा अन्वेषण विभाग (गुन्हे), पुणे.
६) आयुक्त, गुन्हा अन्वेषण विभाग (गुप्तवार्ता), मुंबई.
७) विशेष पोलीस महानिरीक्षक, (प्रशिक्षण व खास पथके), मुंबई.
८) विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, मुंबई.
९) सर्व पोलीस महानिरीक्षक.
१०) सर्व पोलीस अधीक्षक.
११) सर्व पोलीस आयुक्त, (मुंबई वगळून).